माझे मित्र

भालचंद्र कहाळेकर

आणि

भगवंत देशमुख

यांना—

प्रकाशित

ओऽ

साकी

हिरवे गुलाब

आलाप आणि विलाप

बाबू दडके

उत्पात

अलकेचा प्रवासी

बाभूळखेडं !

कुठं कोणत्या देशांत अन् कोणत्या महान तत्वासाठीं लढाई चालूं होती कुणास ठाऊक ! ती कुणी चालवली होती न् कशी चालली होती कांहीं कळत नव्हतं ! ती केव्हां संपणार होती न् संपली असल्यास तिचा शेवट कसा झाला होता याचाहि कुणाला अंदाज लागणं शक्य नव्हतं.

बाभूळखेड्याला फक्त एकच गोष्ट समजली,

" लढाई सुरूं झाली ! "

पूर्वीं असं होतं कीं, कोंबडा आरवला, पांखरं किल्बिल् करूं लागली कीं, बाभूळखेडं मोठ्या उमेदीनं जागं होत होतं. दिवस मोठ्या प्रसन्नतेनं कामधामांत घालवून रात्र पडूं लागली की देवदर्शन, भोजनोत्तर एकाद्या देवळांत भजन किंवा पेर-

पाण्याच्या गोष्टी आटोपल्यावर उद्याचीं मोठीं रम्य स्वप्नं रचित झोपी जात होतं !

सटीला न् पाडव्याला गांवांतल्या बाबूलाल सावकाराकडं जमा करायचं तें केल्यावर खाते-बाकी ऐकून बाभूळ खेड्याचा शेतकरी आपल्या अडाणी पद्धतीनं मनांतल्या मनांत हिशेब करीत होता.

"अं! सव्वाशेच राह्यलेत ! शंभर न् पंचवीस ! त्याची काय मामलत्! म्होरलं साल आलं कीं बाबूलालचं तोंड पहायचं नाहीं !..."

हा निश्चय तडीस जात होता.

मग घरांत एकादं लग्नकार्य उभं राहिलं तर पुन्हां उचल; पुन्हां सवाई; त्याचा घम वाटत नव्हता ! लग्नांत शहरांतला बॅन्डबाजा आणता येत होता. रोषनाईची आरास करतां येत होती. पुढं कसं होईल हे विचार करण्याची अवश्यकताच वाटत नव्हती !

बाभूळखेड्यांतल्या घराघराच्या चतकोर तुकड्यावर जगत असलेल्या फकीराचा फत्तू नांवाचा मुलगा देखील यात्रेंत न् उरुसांत चायना सिल्कचं

शर्ट घालून मारे चैन करीत हिंडत असलेला दिसत होता.

आबादानीनं अमीरांचीं घरं सोन्याचीं केलीं असलीं तरी गरिबांचे निदान उंबरठे का होईना उजवायला कमी केलं नव्हतं !

नामदेव न् नगीनाचं तर कांहीं विचारूं नका !

नामदेव असा निघेल न् नगीना सुध्या मतीनं संसार करील असं कुणालाहि वाटलं नाहीं.

नामा म्हणजे पेतखाऊ, कामांतून गेलेलं न् बिघडलेलं कारटं असाच गांवांत दुर्लौकिक होता. तो विड्या फुंकीत होता. रंगढंग करणाऱ्याच्या अड्ड्यावर त्याची अष्टौप्रहर बैठक होती. खायला प्यायला चांगलं न् वेळेवर मिळावं, घरांत आपली मिजास सांभाळली जावी अशी इच्छा वागवीत होता. चैनबाजीला पैसे कमी पडले तर घरांतल्या गाडग्या मडक्यावर डल्ला मारीत होता अन् तो तसा न मिळाला तर आईशीं भांडत होता. कामधामाच्या गोष्टी निघाल्या तर बापाला दुरुत्तरं करीत होता !

एकुलत्या एक मुलाबद्दल कधीं संतापून तर कधीं वैतागून आईबाप म्हणत होते—

" नाम्या जन्मताच खलास झाला असता तर चारभर फडक्यावरच आटोपलं असतं ! "

बापानं शेतांत मरमर करून कर्जाचा बोजा कमी करण्याचे बेत करायचे, आईनं मोलमजुरी करून संसाराच्या रोजच्या गरजा भागवाव-याच्या, न् कर्त्यासवरत्या मुलानं घरातली असेल नसेल तेवढी चीजवस्तू विकून चैन करीत हिंडायचं !

एकदां तर अशा गोष्टींचा कळस झाला !

आई सरळपणानं पैसे देईना म्हणून रागाच्या तिरमिरीत त्यानं तिच्या तोंडांत भडकावली. म्हातारी झीट येऊन पडली. बायकोच्या हातां-तल्या रुप्याच्या पाटल्या हिसकावून घेऊन एका आडदुकानांत फुंकून टाकल्या न् कोल्हाटणीची धन केली.

मग लहान मोठ्या चोऱ्या होऊं लागल्या. एका जलशांत मुद्देमालासह तो पकडला गेला न् जेलखान्याची हवा खात बसला !

शिक्षा संपवून तो बाहेर आला. बापानं केव्हांच कारभार आटोपला होता. मरूं घातलेली आई

मुलगा दारांत येतांच गतप्राण झाली होती. अन् माहेरीं निघून गेलेली बायको पटकीत पार झाल्याचं वृत्त त्याची वाट पहात होतं.

मग कुठं नामदेवाचे डोळे उघडले. त्यानं थोडसं कर्ज काढलं. एकट्याच उरलेल्या बैलाला जाळी विकत घेतला. शेत नीट केलं. पेरून काढलं. त्यासालीं पीकही अपेक्षेबाहेर आलं. म्हणून बाबूलालच्या अगदीं घशापर्यंत गेलेलं वावर त्याला वाचवितां आलं. तशात नगीनाची न् त्याची गाठ पडली. त्यानं तिच्याशीं म्होतूर लावलं न् एकाद्या सालसमाणसा सारखा तो वागूं लागला !

नगीना तर मुलखाची चवचाल ! लगीन झाल्यावर एकदांच काय ती सासरी गेली न् नांदायचं नाहीं म्हणून सरळ परत आली. गांवातले खडे अंगावर पडूं लागले. एक दिवस नवऱ्याला नोटीस देऊन तिनं सोडचिठ्ठी घेतली. मग तिच्या बदफैली पणाला तर कांहींच ताळतंत्र राहिलं नाहीं ! रावजी नांवाचा एक जोडीदार तिनं निवडला न् 'ठेवला'. त्याच्यासाठीं तिनं घरदार सोडलं. ती स्वतंत्र राहूं लागली. आपली

मोल मजुरीची कमाई त्याच्या सुखावर खर्च करूं लागली रावजीनं तिचा उपभोग घ्यायचा तोवर मनसोक्त घेतला नगीना एकदोन दिवस कुठं परगांवीं गेली होती. रावजीची लग्नाची बायको शहाणी होऊन संसार करायला आली. नगीनाला तें समजलं ती परत आली ती चवताळलेल्या वाघिणी सारखी ! अपरात्रींच रावजीच्या खोलीचं दार तिनं धडकावलं अन् बायको शेजारी झोपलेल्या रावजीला खसकन् ओढून तिनं म्हटलं,

" चहाटला " ! तुझ्यासाठीं घरदार, गणगोत सोडलं. सारी मिळकत तुझ्या जिवासाठीं रिचविली, ती अशी केसानं गळा कापण्यासाठीं ? "

संतापानं ती थरथरत होती रावजी भेदरून निशद्ध उभा होता.

खाडकन् रावजीच्या थोबाडांत भडकावून ती परतली न् रात्रभर मुळमुळ रडत बसली

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जो प्रकाश फाकला, त्यानं अवखळपणातली, अविचारातली सारी मस्ती नाहींशी केली. विवेक आणि सुविचारांना मार्ग करून दिला. दुराचाराचं अंतिम् काय, हें दाखविलं न् नगीनाची चित्तशुद्धि केली.

नामदेवाच्या मागणीला तिनं रुकार दिला तो विवेक खडखडून जागा झाल्यावर !

लोकाचाराला संमत नसलेल्या मार्गांवरून बेफाम धावत सुटलेल्या दोन शक्ति एकत्र आल्यावर केवढं चांगलं कार्य होऊं शकत याची प्रचीती बाभूळखेड्याला येऊं लागली.

नामदेवाच पडायला झालेलं रिकामं घर नगीनानं खरंच धड केलं. ती मोल मजुरी करूं लागली. दोन अडीच मैलावर असलेल्या शहराच्या शनिवारच्या बाजाराला जाऊं लागली. बाजार आटोपून परततांना भिकाऱ्याच्या रांगेतल्या एका दीन आंधळीला नियमानं पैसा टाकूं लागली. अन् देवळा पुढं येतांच तिच्या मनांतला भक्तिभाव जागा होऊं लागला. पूर्वायुष्यातला एखदा मित्र भेटला तर त्याच्याकड ती ढुंकूनहि पाहिनाशी झाली.

नामदेवाशी गंधर्व विवाह झाल्याबरोबर तिच्या ठिकाणीं अशी कांहीं नैतिकता आली कीं कोणत्याहि शीलवतीला ती शोभून दिसावी ! ऐन जवानीतल्या त्या उत्सखळ भरांत तिनं जन-

लज्जेची पर्वा केली नव्हती चव्हाट्यावर घसरलेला पदर तसाच सोडून फिदफिदा हसण्या इतका निर्लज्जपणा तिच्या ठिकाणीं आला होता. रावजी अथवा रावजीसारख्या दोस्ताबरोबर बोलतांना सभ्यतेचा कोणताच संकेत तिनं पाळला नव्हता संसारी झाल्यापासून मात्र तिनं सारे छंद फंद सोडले. चार माणसांसमोर पदर घेऊन ती लवून चालूं लागली. प्रौढपणानं बोलूं लागली पहिल्या रात्रीं आपलं शरीर आणि सर्वस्वच नामदेवाच्या स्वाधीन करायची ती वेळ आली ! त्या वेळेला आतां माधुरी आली होती. एकाद्या ओढ्याकांठीं, पुरुषभर वाढलेल्या ज्वारीच्या गर्द शेतांत, किंवा कधीं एकाद्या पडक्या नाहीतर फाटक्या अडोशाला न धडाडलेलं तिचं काळीज त्यावेळीं थरारलं ! तिनं चटकन् दिवा मालविला.

प्रकाशांत वामगामी जीवनातलीं बिभत्स चित्रं तिला दिसूं लागलीं म्हणून नव्हे ?

उरावरलीं रत्नं चार चौघांत मिरवायची नसतात ! उराशीं धरून तीं आत्मीय करायची अस-

तात! मिणमिणत्या दिवट्याची त्यासाठीं मध्यस्थि कशाला ?

नामदेवानंहि मोठ्या विश्वासानं तिला जवळ केलं!

× × × ×

लढाई आली ती कमालीची दुष्ट अशुभ पसरवीत! लढाई एकाद्या संक्रातीसारखी दक्षिणेकडून येत होती न् उत्तरेकड जात होती अस नव्हे तर दाही दिशांनीं तिचा संचार होता! मागं केव्हां एकदा असंच युद्ध झालं होतं. त्यावेळीं माणसं जबरीनं धरून नेलीं जात होतीं, हीच कायती एक आठवण कांहीं उरलेल्या म्हाताऱ्यांत पुसट होती.

ही नवी लढाई महागाई नांवाची कृत्या घेऊन आली. पूर्वी रुपयाची ज्वारी नवरा बायकोला आठ दिवस पुरत होती. आतां धान्यावर नियंत्रण बसलं. धान्य हळूं हळूं अदृश्य होऊं लागलं न् दिसत होतं त्याचा बाजारभाव पाहून डोळे पांढरे होणार असं वाटूं लागलं. नगीना शनिवारच्या बाजाराला जाऊं लागली. परततांना आंधळ्या

भिकारणीं पुढं येतांच तिचा हात अडखळूं लागला !

कुठं दूरवर रक्तपात होत असतील. त्यांतून कांहीं चांगलं निष्पन्न होणार असेल किंवा नसेल. ही त्यादूरच्या देशांत होणाऱ्या घातपाती कृत्यांनीं मात्र एका सरळ मनावर हा पहिला आघात केला !

एका सकाळीं नगीना पाणोठ्याहून परत येत होती. एक हात डोक्यावरल्या घागरी वर होता. दुसऱ्या हातांत दोरखंडानं भरलेला पोहरा होता. अंगणांतल्या बाजेवर रिकरूटासारखा पोशाख केलेला एक माणूस बसला होता.

जवळ आल्यावर नगीनानं ओळखलं, रावजी !

नगीनाच्या त्या तशा अवघडलेल्या अवस्थेकडं तो टक लावून पहात होता. प्रौढपणांतल्या विकास आणि उल्हासानं उठून दिसत असलेली ती सौंदर्यवेल कित्येक दिवसानंतर तो पहात होता. मस्तीच्या भरांत कुरवाळलेलीं न् चुंबिलेलीं यौवनंपुष्प होतीं तशीच होतीं. किंबहुना तीं आतां अधिक आकर्षक आणि उपभोग्य दिसत होतीं. तीं पुन्हां जवळून पहाण्याची न् कुरवाळण्याची

एक अनावर इच्छा रावजीच्या मनांत उद्भवली त्याच्या दृष्टीला उत्कठेनं एक विचित्र धार आली.

ती धार नगीनाला गुदगुल्या करण्याऐवजीं बोचली मात्र ! तिनं घाईनं घागर खाली ठेवली न् पदर सरळ करून तोंडाचा न् गळ्याचा ओलावलेला भाग पुसून काढला.

त्यानं विचारलं,

" वळख आहे ना ? "

तिनं माननंच होकार दिल्यासारखं केलं

त्यानंतर कांही क्षण मोठी विचित्र शांतता होती. काय बोलावं हें दोघांनाहि समजत नव्हत तशांत नामदेव आला. त्यानं रावजीला ओळखल्यावर म्हटलं,

" अरे वा ! रावजी? कवाशिक् आली सवारी ! बायकापोरं खुशाल आहेत ? "

मग त्यान घरांत डोकावलं न् म्हटलं,

" अग ए, रावजी आलाय् कांहीं च्या पानी कर की !"...

अर्धुऱ्या गुळाचं कढतं पाणी पोटांत गेल्यावर गोष्टी सुरू झाल्या. रावजी फौजेत नौकर होता. मरणाचं भय टाकलं तर मानाची न् सुखाची नौकरी होती. त्यानं शहरांत घर केलं होत. दर महिन्याला पधरावीस रुपये बायकोच्या नांवानं पाठवितां येत होते पोशाख आणि खाण्यापिण्याची वाण नव्हती. एवढी महागाई असली तरी सामान मिळवायची फारशी अडचण पडत नव्हती. एका फौजी माणसाचं कुटुंब सरकार उपाशी मरू देईल हे शक्य नव्हत. मान मरातबाच कांहीं विचारू नका ! फौजी म्हटलं कीं गाडीत ऐस-पैस जागा मिळत होती किंवा स्वतंत्र डब्यांतून व्यवस्था होत होती. तो आघाडीवर असला न् घरीं एकादी अडचण निघाली तर ती अधि-काऱ्यांना सांगून चटकन् दूर करता येत होती.

नामदेवाच्या मनांत निराळीं कल्पना वर्तुळं चमकूं लागलीं. रावजीसारखाच स्वतःच्या अंगा-वर त्याला पोशाख दिसला. खिशांत पैसे खुळखुळूं लागले. नियमानं दर महिन्याला तो नगीनाच्या नांवानं मनिऑर्डर पाठवूं लागला. शेतांतली मर-

मर नाहीं. बाबूलालचा लकडा नाहीं, कांहीं नाहीं !

रात्रीं नगीनाजवळ लढाईत जाण्याची त्यानं गोष्ट काढली. एकादी अशुभवाणी ऐकल्यावर व्हावं तसं तिचं सारं अंग सकंप झालं. तिनं म्हटलं,

"मला एकाद्या इहीरींत टाका न् मग करा काय करायचं ते !"

बराच वेळ ती कांहीं बोलली नाहीं. "एडी" असं म्हणून नामदेवानं मिठी मारली तेव्हां तिला बरं वाटलं अन् मनांत सलत असलेला एक संशय नाहींसा झाला

कुठून रावजी आला होता कुणास ठाऊक ! त्यानं नामदेवाच्या डोक्यांत नसते विचार रुजविले होते. एवढंच नव्हे तर तिचंही मन अशांत करून टाकलं होतं.

तो पुनः पुन्हां मोठ्या भुकेल्या नजरेनं तिच्या-कडं पहात होता. नामदेव घरांत नाहीं अशी संधी पाहून त्यानं नगीनाला म्हटलं होतं, "नगीना ! तुला पहावं, भेटावं म्हणून इथवर आलों. तूं तर बोलायलाहि राजी नाहींस !..."

नगीनानं कांहींच उत्तर केलं नव्हतं ! अन् अशा मुग्धतेतच त्यांची भेट संपली होती.

नगीनाचं मन एकाच विचारानं भारावलं होतं. रावजीच्या आगमनानं नामदेवाच्या मनांत आपल्याविषयीं एकादा संशय तर आला नसेल, या भयानंच रावजीची नजर ती टाळीत होती. मिठी पडल्यावर नामदेवाचं मन अविचल असल्याची तिची खात्री झाली. नामदेव खरंच एक देव माणूस होता, या सुखद समजुतीनं तिनंहि मिठी घातली होती न् ती अधिकच दृढतर केली होती !

× × × ×

कलेक्टरांच्या न् मामलेदारांच्या बढत्या खोळंबून असाव्या लढाई अशा अवस्थेत आली होती कीं मरायला माणसं कमी पडणार असं वाटत होतं. माणूस नाहीं म्हटलं कीं लढाई कशी चालणार ? दोस्तांच्या युद्ध प्रयत्नांना मदत म्हणून प्रथम खेडींपाडीं झाडून न् झटकून भरपूर पैसा नेला होता. त्या पैशांत दारूगोळ्याची पैदास भरपूर झाली होती. पण तो छातीवर घ्यायला न् छातीवर उडवायला माणूस तर हवा होता ना !

अगदी वरच्या थराच्या लढाईच्या व्यवस्थापकां-तून हुकूम सुटले,

" माणसं पाठवा ! "

हुकमाची धडक संस्थानांतल्या कलेक्टर मामलेदारांच्या छातीवर येऊन आदळली. नौकरी करायची म्हटलं तर मामलेदारान कलेक्टर साहेबाला खूप ठेवणं भाग होत. अन् खूप ठेवणं म्हणजे कांहीं खेडुतांचं जीवन सार्वभौम सत्तेचा प्रतिनिधी म्हणून आलेल्या फौजी अधिकाऱ्याच्या स्वाधीन करण आवश्यक होत !

ही एक भयकर लांच होती !

अन् लोकांचं जीवनसंरक्षण करण्याचा अधि-कार ज्यांना होता ते, ही लांच देत घेत होते !

बाभूळखेड्यावर मामलेदार साहेब दौऱ्यावर आले चावडीवर तळ पडला. गांवातली पंधरा-वीस जवान पोरं धरून बसविलीं. नामदेवाची शरीरयष्टी तर सगळ्यांत उजवी ! कमीत कमी दोन तीन गोळ्यापर्यंत सहज टिकाव धरील अशी ! नामदेवानं पंधरावीसजणांच्या मेळ्यांत बसतांना प्रथम विशेष कुरकूर केली नाहीं. पण

वेळ जाऊं लागला तसतशी विलक्षण भयकारक दृष्यं त्याच्या डोळ्यापुढून सरकलीं बाभूळ-खेड्याच्या शिवेवरचं त्याचं शेत एकदम जोमानं रसरसून आल. पण नामदेवाला तिथपर्यंत पोचतां येईना. सुगीच्या खुशीत नगीना हंसत उभी असलेली दिसली पण तिला जवळ करतां येईना. मग साऱ्या गात्रांत एकदम बधिरता येऊन रस-रसलेलं शेत न् मुसमुसलेली नगीना दृष्टी आड झाली. नामदेव मेला ! तोही दूरच्या अनोळखी प्रान्तात-जिथं त्याची नगीना नाहीं, शेत नाहीं अन् बाभूळखेड्याचं परिचित वातावरण नाहीं !

नामदेवाच्या अंगावर काटा उभा राहिला ! त्याला वाटलं आपण इथून पळून जावं पण तेथून हालण कठीण होतं अन् तें जस जसं कठीण वाटत गेलं तसतशी त्याच्या काळजाची धडकी वाढत गेली !

मामलेदारसाहेब आवेशानं व्याख्यान देत होते. हिंदुस्थान, आपलं सरकार, ब्रिटिश सत्ता, जपान, शत्रू, संकट अशा एकेक फुगीर शब्दांच्या अड्या-तून एकच सार निघालं होतं,

" फौजेंतली नौकरी चांगली आहे ! "

नगीना दारांत बसून ढसढसा रडूं लागली. नामदेवाला कुणी कुठं जबरीन धरून न्यावं न् मरणाच्या खाईत लोटावं ! नगीनाच्या उद्याच्या जीवनाचा त्राता कोण? नामदेवाचं तिकडं कसं होईल, या प्रश्नानं तर तिच काळीज विंधून गेलं. ज्यानं नामदेवाचं नांव सुचविलं होतं त्या पाटला-कडं ती गेली. तिनं त्याचे पाय धरले. अन् अखेर नामदेवाला चावडीवरून सोडवून तिनं परत आणलं !

त्या रात्रीं त्यांच्या घरांत उजळलेला दिवा अधिक तेजाळ दिसत होता. त्यांचे चेहरेहि तसेच सुप्रसन्न दिसत होते.

पण यासाठी केवढी जबर किंमत पडली. अडीचशे तीनशे अधिकाऱ्याला न् शेसव्वाशे मधलोबाला द्यावे लागले होते. बालूलालची खानेबाकी कमी होत आली होती ती एकदम फुगली !

तरी कर्जाच्या काळजीनं ते व्यग्र झाले नाहीत. नामदेवाला नगीना मिळाली होती न् नगीनाला नामदेव मिळाला होता. परस्परांनीं परस्परांना

घट्ट मिठी मारली अन् आपल्या प्रीतीची प्रगाढता पटविली !

× × × ×

दिवस फारच कष्टाचे येऊं लागले.

महागाईनं उच्चांक गाठला होता. अन् लेव्हिनं व्यवस्थित पाय पसरले होते. ही लेव्ही म्हणजे लढाईतून निघालेलं आणखी एक शस्त्र होतं. पिकाची आणेवारी नोंदली जात होती. प्रत्येक एकरावर कांहीं एका प्रमाणांत धान्य वसूल केलं जात होतं. 'खुष खरेदी' म्हणून आणखी एक नियम केला होता वसुलीसाठीं सरकारचे दूत जोरांत हिंडत होते. लॉऱ्या फिरत होत्या गोदाम बांधले गेले होते. एक नवच अन् कित्येक माणसांच्या स्वैर संचाराला वाव देणारं 'खातं' उघडलं होतं! धान्याच्या वागणीच्या वागणी कुठं भरून जात होत्या, कांहीं कळत नव्हतं !

बाभूळखेड्यानं लेव्हीचं पहिलं वर्ष कसं बसं काढलं. मग पावसाळा आला न् कोरडाफट् गेला. अर्धवट पिकं आलीं. अन् आतां कसं होणार याचिंतेन बाभूळखेड्याला गांठलं न ग्रासलं !

नगीना शहराला आली होती खेड्यातलं जीवन गुंडाळून शहरांतल्या गोदामांत आणून जतन केलं होतं ! शहरांत गेल्यावर कुठल्याशा एका ठिकाणाहून चिठ्ठी मिळवायची न् वाटपाच्या दुकानावरून ज्वारी घ्यावयाची असा क्रम होता. दुकानापुढ गर्दी बेसुमार दिसत होती.

"नगीना !"

कुणी हांक मारली म्हणून तिनं वळून पाहिलं. तो रावजी होता. पूर्वीपेक्षा लठ्ठ आणि तजेलदार. ती ज्वारीसाठीं थांबली आहे असं कळल्यावर त्यानं तिच्या हातातलं कूपन घेतलं. थोडासा धांगडधिंगा करून त्यान गर्दी हटवली. गर्दी करणारांना शिव्या सुनावल्या न् चटकन् ज्वारी घेऊन तो परत आला तो अशा थाटांत कीं, जणूं आजकालच्या जगांत जीवनार्थ मिळवावा तो फौजी लोकांनीं !

गर्दीतून बाहेर पडल्यावर नगीना पैसे त्याच्या हातीं देऊं लागली. तेव्हां तो म्हणाला,

"राहूं दे तुझ्याजवळ. इतका कां मी परका आहे ?"

मग कांहीं तरी बोलणं आवश्यक होत असं वाटून तिन विचारलं, "घरधनीण कुठ आहे?"

"खलास!"

एकादी मोठी आनदाची गोष्ट सांगावी तशा आवाजांत हाताचा पजा आकाशांत उडवून तो बोलूं लागला.

बायकोच्या मृत्यूची वार्ता एवढ्या बेफिकीरीनं त्यानं सांगावी हे नगीनाला आवडलं नाहीं.

रस्त्यांतली रिकामटेकडीं माणस या दोघाकडं आश्चर्यांनं पहात होतीं. या फौजी माणसानं एकादी परी गाठली होती की काय?

तो तिची सोबत करण्याच्या तयारीन चालूं लागला. गांवाबाहेर पडल्यावर थोडासा एकान्त आलेला पाहून रावजी म्हणाला,

"मागं झालं तें विसरून जा. आतां मी एकटाच उरलों आहे. माझा पगारही वाढला आहे. एवढे पैसे आतां कुणासाठीं मिळवायचे?"

"रावजी, लगीन कर दुसरं!"

"असं तोडून बोलूं नकोस नगीना! तुझ्या-गळ्याची शपथ घेऊन सांगतो, माझं मन तुझ्या शिवाय कुठच लागत नाहीं!"

"असं बोलूं नकोस रावजी!"

"नगीना ऽ!"

त्याच्या आवाजाला कांतरता आली. त्यान तिचा हात धरला न् तिला थांबवून म्हटलं,

"माझं मन मोडूं नकोस! हे घे, हें पैसे ठेव तुझ्याजवळ! मला तरी काय करायचेत्!"

खिशांतून नोटांच एक पुडकं त्यान काढल न् नगीनापुढ केलं.

"ह, रावजी!"

ज्या आडदांडपणान रावजीच्या खोलींत शिरून त्याला शासन केल होत, कांहीशा तशाच आवे-शांत तिन हे वाक्य उच्चारल, अन् रावजीवर अशी दृष्टी टाकली कीं पटकन् त्यान तिचा हात सोडून दिला.

जणूं स्त्री राजी आहे तोंवरच लाघवासारख्या नाजूक उपायांनीं वश होऊं शकते. नाराज स्त्रीला

जिंकायला संपत्तीची मध्यस्थीहि उपयोगी पडत नाहीं !

रावजी निराश होऊन परत जात होता! नगीनानं एक मोठी लढाई जिंकली होती !

× × × ×

बाभूळखेड्यांत दुष्ट चिन्हांचा आता सुकाळ झाला होता. कुत्रीं मरत होतीं तीं अर्धी वस्तीच्या नांवानं मोठा गळा काढून! जनावरांना रोगटं होत होतं. चांगले दमदार न् कामकरी बैल आडवे पडत होते. नामदेवाचा एक बैल कामाला आला.

दुसरा चाऱ्याला तोंड लाविनासा झाला. नामदेवांत रडण्याचंहि सामर्थ्य उरलं नव्हतं. सुगी आली होती. पण शेतांत फारसं धान्य निघालं नव्हतं. आणेवारी मांडणारानं नामदेवा-कडून कांहीं मिळालं नाहीं म्हणून पीक भरम-साठ दाखविलं होतं. लेव्हीच्या वसूलीला कायदा आणि काठी घेऊन सरकार आलं तेव्हां सारं घर धुवून साफ झालं. एक दिवसाची चंदी देखील उरली नाहीं.

'खुष खरेदी'च्या नांवानं द्यायला कांहीं नाही, असं म्हणतांच मामलेदारानं चपराशाला हुकूम केला, न् नामदेवाला बेदम झोडण्यांत आलं! त्या लहानशा क्षेत्रांत कांहीं दिवस तरी त्यानं नेकीन काढले होते. सुजनतेच्या जपणुकींत इभ्रतीची एक कल्पना उद्भवली होती. सरकारी शिपुरड्यांनीं तिचा कोट फोडला! शरीराच्या वेदनापेक्षां या अपमानाच्या वेदनांनीच नामदेवाचं मन खचल. शरमेन न् अवमानान कांही दिवस त्यानं आंथरूणावर काढले. तशांत एक बैल कमी झाला न दुसरा जगतो की मरतो याचा अंदाज लागेना! थोडंस शेताकड जावं या विचारान तो उठला. गांवांत प्रसन्नता अशी दिसत नव्हती. धान्याच्या तुटीनं तेथल जीवन कसं भकास, उदास झाल होतं. शेताच्या उरळीवर बसून तो समोर पाहूं लागला. नांगरट वुजलेली कोरडी काळीफट् जमीन मनांत फारसा उल्हास निर्माण करीना. ती तशीच खूप लांबवर पसरली होती. तिनच त्याला आजवर पाळल न् पोसलं होतं अन् आजचा कडवट दिवसही तिनच दाखविला होता. तिला आणखी एकदां

नांगराव, नीट करावं असा विचार येतांच बैलाची अडचण पुढं आली. तशांत बाबूलालच्या कर्जाचा आकडा एकदम मोठा फुगून दिसला ! छे ! जमीन त्याच्या हातीं आतां राहील असं वाटत नव्हतं ! पुढचा काळ कसा काढायचा या विचारानं तर तो अगदी घायाळ झाला. एकदम मनःचक्षूपुढं रावजी आला ! खरंच नामदेवानं लढाईत जायला पाहिजे होतं ! जे भोग वाट्याला आले न् येताहेत ते तसे आले नसते. त्यानं केवढी चूक केली होती.

केवळ नगीना मुळंच तो अडखळला होता न् काय !

नगीना शहराहून परत येत होती. सभोंवार पसरलेल्या शेतासारखीच तिच्या चेहऱ्यावर अवकळा पसरली होती. एवढं धडधाकट आणि सुंदर शरीर, पण काळजीन कसं शुष्क, निस्तेज दिसत होतं. ज्वारीच दुकान एकाएकी बंद झालं होतं ज्वारी मिळाली नव्हती इतका वेळ थांबून अखेर रिकामंच परत यावं लागलं होत ! नामदेव आजारी होता. तिची एकटीची मजुरी रोजच्या

खाण्यापिण्यासाठीं पुरे पडत नव्हती! विचारा-विचारांत तिला भास होत होता कीं काय कुणाला माहित! कुणी तरी तिला हांक मारीत होतं, 'नगीना!'

रावजीच तो!

तो चटकन् कुठून तरी आला न् ज्वारीच्या दुकानांतून तिला त्यानं ज्वारी आणून दिली! मग खिशांतल नोटांचं एक पुडकं त्यानं काढलं. तें नगीना पुढं केलं न् म्हटलं,

काय म्हटलं कुणाला माहित?

त्याच्या त्या शब्दांचा मात्र तिला आतां राग आला नव्हता!

तिकडं लढाईला जोर चढत होता अन् इकडं या शहरांत कामधामाचे नुसते डोंगरच्या डोंगर उकरावे अन् उरकावे लागत होते! शहराच्या मुख्याधिकाऱ्याला, त्याच्या अंमलाखालील अन् संबंधीं खात्यांतल्या माणसांना दिवस पुरे पडत नव्हता!

महिना संपत आला कीं जीवनोपयोगीवस्तूंचा कोटा, साठा, विभागणी, वाटणी, देखरेख अशा कित्येक गोष्टीशीं तोंड द्यावं लागत होतं! कांहीं एका ठराविक तारखेला दर माणसागणिक ज्वारी गहूं, तांदूळ, साखऱ्या, तेल आणि कापडाचे 'परवाने' द्यावे लागत होते. सरकारी निवडीचा ठसा असलेल्या दुकानदाराकडून मालाची विक्री होत होती! शहराची लोकसंख्या वाढली होती

कीं काय नकळे ! धान्य न् कापड दुकानावर यावयाला उशीर, दुसऱ्या दिवशीं बाजार सुना ! " वाटप प्रमाणांत नाहीं " अशी एक सनदशीर ओरड होती. न् " वाटप मुळींच मिळालं नाहीं." या ओरडीनं तर अधिकाऱ्याचे कान किटले होते. लोकांना ओरडायची संवयच लागली होती. युद्धभूमीपासून ते दूर होते म्हणून थोड तरी मिळत होत ! नाहीं तर उपाशीं मरावं लागलं असतं अशी सरकारी वर्तुलाची विचारांची तऱ्हा होती. लोकांचे पुढारी ह्मणविणारी कांहीं माणसं सभा भरवीत होतीं, अधिकाऱ्याकडं शिष्टमंडळ नेत होतीं. परिस्थिती सुधारण्याचं अभिवचन मिळत होतं. अन् मग पुन्हां ओरड सुरू होती !

परिस्थिती सुधारण्याचं सरकारी अभिवचन म्हणजे फार्स, असाच आजवरचा अनुभव होता.

धान्याची न् कापडाची तूट कशी नाहींशी करावी या विचारांत सरकारच्या प्रतिनिधींना झोप नसल्याचं ऐकूं येत होत ! धान्यावाचून मरू घातलेल्या लोकांना न् त्यांना वाचविण्यासाठीं धड-पडत असलेल्या पुढाऱ्यांनाहि झोप नव्हती ! मग बापू सीताराम कत्रुबारला तरी आराम कुठला ?

तिकडं लढाई ऐन रंगांत येत होती अन् हा हिकडं आत्मरंगात गुंग होऊन जात होता!

त्याच्या दुकानापुढून जी रहदारी सरकत होती तांत अर्धनग्न भुके कंगाल होते. अन्न धान्याचे पोशाखी गरजूं होते. अन्न धान्याची व्यवस्था करणारे होते. अन् त्या व्यवस्थेवर जगणारे होते! त्या सर्वांकडं पाहून तो तुच्छतेनं हंसत होता. त्याच्या मनांत एकच विचार स्थिरावला होता. कीं, लोकांच्या गरजा बेसुमार वाढाव्या, जिकडं तिकडं पदार्थांची दुर्भिळता भडकली जावी, बाजारभाव आणखी कडाडले जावे अन् मग पहावी मजा!

सामान्य मनाला न झेपणारा असा दमदार विचार मनांत वागविण्याची बापूच्या मनाची चांगली तयारी झाली होती. पण या विचाराची पुसट लकेर देखील चेहऱ्यावर दिसूं न देण्याचा अभ्यासहि त्याला होता. कारण एकादं ग्राहक आलं कीं केवढ्या सौजन्यानं तो स्वागत करीत होता! तो विचारील ती नेमकी वस्तू मात्र त्याच्या दुकानांत नसायची हे अगदीं ठरून गेलं होतं.

"काय धोतर जोडा? अहो भल्याभल्यांना मिळेनासा झाला आहे!"

असं उत्तर एकाद्या साध्यासुध्या ग्राहकाला तो चटकन् अशा पद्धतींत देत होता कीं जणूं कापडाच्या साऱ्या गिरण्या शोधून पाहिल्या तरी, धोतरजोडा मिळणं शक्य नाहीं!

ग्राहक परिचयाचा अन् चांगलाच नडलेला दिसला कीं तो म्हणत असे,

"अहो बाजारांत माल काय नाहीं म्हणता? दाम फेकलें कीं माल घर चालत येईल! आज कालचे दिवस कसे आहेत तुम्ही जाणताच!"

अन् मग त्याला अगदीं रहस्यांत घेऊन म्हणे,

"केवळ तुमच्यासाठीं म्हणून मी घेईन शोध आणि देईन हवं तें! मात्र किमतीचा कांहीं अंदाज सांगतां येणार नाहीं!"

एकादा कायदे कानूनवाला आला तरी कत्रुवार मुळींच भीत नव्हता. असलं ग्राहक संतापून तणतणत अधिकाऱ्याकडं जात होतं अन् थंड उत्तर ऐकून गार होऊन परत येत होतं!

माल गडप होणं, कांहीं एक ठराविक किंमत आली तरच तो प्रगट होणं अन् अधिकाऱ्यांनीं त्याकडं दुर्लक्ष करणं या तिन्हीं गोष्टींत एक विशिष्ट सूत्र असल्याची खात्री होत होती !

अशाच एका गरजवंताला कत्रुवारनं नुकतंच परत लावलं. तो ग्राहक आला होता तो, जणूं त्याच्या प्रसन्न विचारांत अडथळा आणण्यासाठींच ! नुकतीच समोरची चाळ त्यानं विकत घेतली होती. तिला लागून असलेली आणखी एक चाळ विकत घ्यावयाचे त्याचे बेत चालले होते. तो ग्राहक आला अन् पांढरं कापड मागूं लागला. तें अर्थात अंत्यविधीसाठीं ! तें चितेवर चढणाऱ्या प्रेतासाठीं असो किंवा बोहल्यावर चढणाऱ्या वरासाठीं असो ! भाव येत नसल्यास द्यायचं कसं ? त्याला ती समोरची चाळ घ्यायची होती. त्या चाळींत इतके भाडेकरू होते. दर महिन्याला अमूक इतकी रकम यावयाचा मार्ग निघणार होता. ती चाळ विकत घ्यावयाची कीं पडत्या भावांत प्रेतासाठीं कापड द्यायचं ?

दुकानापुढून कुणीसा एक अधिकारी जाऊं लागला. दोघांची नजरानजर झाली. अभिवादना-

साठी आधी कुणी कुणाला हात उचलला हें मात्र समजलं नाहीं. दोघांचंहि परस्परावर सारखंच ऋण होतं ! अधिकारी मनांत म्हणत होता, कत्रु-वार माझ्या मुळं तुझी धडगत आहे ! कत्रुवारनंहि तें ओळखलं होतं न् प्रत्युत्तर केलं होतं, पुरे, पुरे, माहित आहे आपली कुवत !

कत्रुवारला जे फार पूर्वीपासून ओळखतात त्यांच्या नजरेपुढं फक्त एकच चित्र आहे ! आड-बोळातलं एक दीडखणी दुकान. तिथं हमाल मजुरांनाच तेल मीठ मिळालं तर मिळायचं. बापू नांवाचं एक पोरगं दर आठवड्याला चुक-वती करून पंधरा वीस रुपयाचं नवीन सामान उचलायचं. छटाक अदपावापेक्षां कांहीं वजनं असूं शकतात याची त्याला कल्पनाहि नसावी ! आठदहा रुपयांच्यावर कधीं नाणं मोजण्याचाहि त्याच्यावर प्रसंग आला नसावा. कापड बाजार पहाणं म्हणजे एकाद्या काशी यात्रेसारखीच क्वचित येणारी संधी वाटली असावी. फाटक्या बार-दाण्यावर बसता बसता त्याचा न् त्याच्या बापाचा जन्म गेला ! दिवाळीचं लक्ष्मीपूजन

एकापणती वर अन् एका सुपारीवर त्यानं आटोपलेलं असावं !

पण आज ?

या शहरांत आजकाल दिवस प्रथम कुणाच्या घरावर उगवत होता, सत्काराची न् स्वीकाराची सुखं वाट पहात बसतील असं कुणाचं घर होतं, समृद्धीचं वरदान देवादिकांनीं कुणाला दिलं होतं, सरकार दरबारांत मानमरातब ठेवून कोण होतं, अन् बाजारांत विशेष बोलबाला कुणाचा होता ?

या सर्व प्रश्नांचीं उत्तरं एकाच नांवांत सामावलीं होतीं.

बापू सीताराम कत्रुवार उर्फ बापू शेठ !

तरी वाड्याचा कांहीं भाग अद्याप बांधून निघायचा होता. पैसे नव्हते म्हणता ? अहो बोलता काय ? एक भार बांधकामाचा मालमसाला अन् दोन भार सोनं अशा पद्धतीनं बांधकाम चालूं ठेवायची कत्रुरवारची तयारी होती.

पण ह्या लढाईन लोखंड दुर्मिळ करून टाकलं होतं !

पाचसहा कुटुंबं सहज समावूं शकतील एवढा वाड्याचा विस्तार. वाड्यांत मोठमोठ्या लादण्या काढल्या होत्या. त्या नेहमीं कुलपं टाकलेल्या न् बंद ! रात्रीं अपरात्रींच त्या उघडल्या तर उघडत.

आंत काय असावं ?

तें एक बापू कत्रुवार जाणें किंवा लादण्यासारखंच कत्रूवारनं तोंड बंद केलेले खाद्यपदार्थांचे, कपड्यालत्त्याचे सरकारी नियंत्रक जाणोत !

आंत आजच्या राष्ट्राचं जीवन होतं ! आजच्या सुसंस्कृत मनुष्य समाजाची इभ्रत होती ! उद्याच्या जीवनाचं मर्म होतं ! मनुष्य जातीचं रक्षण करतां येईल किंवा तिच्या भक्षणाची तयारी ठेवतां येईल अशी महान् शक्ति आंत होती !

काळ्या बाजारांतच प्रगट होऊं शकणारं जीवनसर्वस्व धान्य आणि माणूस ज्यामुळं सुसंस्कृत सुंदर दिसूं शकतो तें कापड !

जसं जसा बाजार काळा होणार होता तसं तसं कत्रुवारचं नशीब उजळ होणार होतं! तिकडं लढाई सुरू झाली अन् हिकडं रुप्याचा भला मोठा लोंढा वहात सुटला! त्या धारत जे आले ते पिवळे होऊं लागले! कत्रुवार या लोंढ्यांत चांगला न्हाऊन निघाला होता, निघत होतान् निघणार होता!

कत्रुवारच्या घरांत धन धान्य कसं उतूं आणि वाया चाललं होतं तें पहा! खायची प्यायची घरांत नुसती चंगळ उडत होती. भांडीं उटा-यच्या चौकांतून जी नाली वहात होती तींत भाताचीं शितं न् ऊंची खाद्य पेयांचीं उष्टीं तुंबून बसत होतीं. कत्रुवारचीं दोन तीन पोरं खात होतीं न् ओकत होतीं. अन् मग त्यांना अन्न मानवत नाहीं असं वाटून देव दवस्की न् दवा-खाने केले जात होतीं!

रस्त्यावरल्या माडीच्या दाराशी एका मऊ उबदार आंथरुणावर बसलेली, टोपपदराचं इर-कली लुगडं नेसलेली म्हातारी म्हणजे बापू-शेठची आई सोनूबाई! सोनुबाई आतां साक्षात्

सोनूबाई दिसत होती. सीताराम कत्रुवारचा संसार कष्टाचा होता आतां कष्ट करावे असं वय नव्हत अन् परिस्थिती तर नव्हतीच नव्हती ! अन्न ब्रम्हाच्या साधनेत न् आराधनेत हालचाल करतां करतां शीण येत होता आतां अन्न ब्रह्माचा वर लाभल्या मुळं ती इतकी स्थूल होती कीं, बसली जागा तिला उठवत नव्हती. ते अवजड शरीर, ते टापपदराचं लुगडं अन् कातडींत रुतून चाललेले ते अलंकार असा तो अवतार दिसला कीं हंसू येत होतं. एकाद्यानं सहज पाहिलं तरी म्हातारी संतापून म्हणत होती,

“ मेल्यांना माझं सुख देखवेनासं झालं आहे ! ”

तिला भ्रम झाला होता यांत शंका नव्हती ! तिला अलीकडं ऐकूंहि येत नव्हतं. तिच्या जवळ कानांत कुजबुजायची अथवा हसायची कांहीं सोय नव्हती ! तसा कांहीं प्रकार झाला कीं म्हातारी अंगावर खेकसलीच म्हणून समजावी !

माडीवरच्या आणखी एका सजविलेल्या खोलींत जीवनाचं एक वेगळंच चित्र दिसत होतं. बापूचे वडील सीताराम कत्रुवार! गाद्यान् गिर-

घ्यांच्या गराड्यांत निस्तब्ध, निश्चय आणि निशब्द पडलेले ! खोलीं जितकी सजविलेली न् सुशोभित तितकीच अवकळा आणि असुंदरता सीतारामवर पसरलेली. शरीर इतकं खिळ खिळं न लुकडं झालं होतं की गाद्या गिरद्यांच्या गराड्यांत एकादा माणसाचा फासोळा पडला आहे हे बारकाईनं पाहिलं तरच कल्पना येत होती ! त्या वाळलेल्या हात पायांची हालचाल करायची झाली तर इतर माणसांची मदत घ्यावा लागत होती !

कसे सोन्याचे दिवस आले होते ! बापू तिकडं दुकानावर बसून राजरोस डाके आणि डल्ले मारित होता ! भले बापू ! शाबास बापू ! असं म्हणून त्याला प्रोत्साहन द्यायचं सोडून सीताराम कन्नुवार राजयक्ष्म्याची न् रक्तक्षयाची निदानं न् अनुमानं ऐकत आणि अनुभवित पडला होता ! घरांत कापडाचा एवढा ढिगारा पडला होता. पण सीतारामच्या शरिराला वस्त्र पोळत आणि रुतत असावं ! धान्याच्या नुसत्या थप्याच्या थप्या लागल्या होत्या. पण घोटभर पाण्याशिवाय त्याच्या पोटांत विशेष कांहीं जाऊं शकेल असं दिसत नव्हतं. मृत्यूचे कित्येक दिवसापासून

वेध लागले होते. तो दुसऱ्या एकाद्या घरीं असतां तर एव्हांना गंगारूप होऊन गेला असता. पण बापूच्या हातांत संपत्ती होती न् त्यामुळं जीवनाच्या रक्षणाचे सर्व उपाय, सर्व सोयी उपलब्ध करतां येत होत्या ! सीताराम एवढ्यांत कचेल असं मुळींच वाटत नव्हतं ?

वडिलाचं असं क्षीण चित्र बापूच्या डोळ्यापुढं आलं. त्याला वाईट वाटलं. गंजांत आणखी एक दुकान उघडायचं होतं. लढाईचा मोसम केव्हां फटकन संपून जाईल कांहीं कळत नव्हतं. दुसऱ्या दुकानावर बसायला घरचा, विश्वासू असा माणूस सीतारामाखेरीज कोण होता? त्यांच्या आजारानं प्राप्तीचा एक फार मोठा झराच अडून बसला होता !

इतक्यांत दुकानापुढून एक खेडवळ स्त्री सरकली. बापूनं तिच्याकडं न्याहळून पाहिलं. बापूचं मन जाईल अशी ती नव्हती. गोरी, पोरसवदा, पण शुष्क आणि निस्तेज ! नुसतं पहावं न् तुच्छतेनं तोंड वळवावं ! त्यापेक्षां बापूची बायको कशी पुष्ट आणि सुंदर ! उंची वसनानं

न् अलंकाराच्या भारानं तर ती एकाद्या महा-लक्ष्मी सारखी दिसत होती दुकानावर बसून केलेले संकल्प सफल झालेले अनुभवित घरीं जावं न तिच्या गुबगुबीत शरीराची हालचाल पाहून डोळे निववीत शरीर सुखार्थींत झोपी जाव!

या रस्त्यावरल्या खेडवळ चित्रांत बापूच्या वाढत्या उमेदीच शमन करण्याचं सामर्थ्य तरी होतं कां?

बापूला हे मात्र माहीत नव्हतं की त्या रस्त्या-वरील स्त्रीच्या पोटऱ्यांतून पुष्टी आणणारा, शुष्क स्तनांच्या हिरव्या शिरांतून रक्त खेळविणारा, चेहऱ्यावर तजेला फुलविणारा, सारीच काया कमनीय आणि उपभोग्य करणारा धान्याचा कण महाग आणि दुर्मिळ झाला होता! बापू न बापूचे लक्षावधी संबंधीं त्याला कारण होते. ह्या स्त्रीच्या सौंदर्यातला सारा उत्तमांश पिळून बापूनं आपल्या बायकोवर सारवला होता! कित्ये-कांची जीवनशक्ति शोधून आपल्या घरांत साठ-विली होती!

आणि तरीहि त्याचे विचार चालूच होते.

लोकांच्या गरजा बेसुमार वाढाव्या; जिकडं तिकड पदार्थांची दुर्मिळता भडकली जावी; बाजारभाव आणखी कडाडले जावे, अन् छन् छन् असा एकच आवाज कानाशीं सारखा घोटाळत रहावा!

‘ हुकुमशहाचा अंत ! ’

अशा अर्थाच्या बातमी खालीं लोकांनी त्या प्रेताची विटंबना केल्याचा जो मजकूर होता, तो वाचून मला वाटलं, काय हा लोकदेवतेचा लोक-विलक्षण प्रणयप्रपंच !

रामराज्य यावं म्हणून लोकांनीं तपश्चर्या केली-अखेर हवं ते रामराज्य आलं ! आणि सीते-सारख्या साध्वीवर विकल्पांचा वर्षाव करून ज्यानं तें राज्य आणलं त्या रामाला लोकांनीं मात्र दुःखी केलं !

आपल्या प्रतिभेनं विचारांनीं नवनवीं क्षितिजं ज्यानं निर्माण केली, त्या साक्रेटिसाला विषाचा प्याला पाजविला तो ह्याच लोकदेवतेनं ! त्याच्या

मृत्यूनंतर कुठं त्यानं घडलेल्या संस्कृतीच्या अलंकारांचं महत्व कळून ती त्याच्या नांवानं ते उरावर वाहूं लागली अन् त्यांचं रक्षण करूं लागली.

अधर्म प्रवृत्तांचं न् पशुतेचं राज्य होतं. सदाचाराचीं वस्त्रं न् आभुषणं मलीन होऊन गेली होती. नग्न, निर्भूषण आणि निःसंग लोक देवतेची अवकळा पाहून कुणी एक महात्मा अवतरला अन् त्यानं तिजवर दयेची शाल घातली. उन्मत्त आणि अविचारी लोकदेवतेनं 'यानं माझ्याशीं प्रसंग केला !' अशी ओरड करून त्याला फासावर चढविले. प्रभूच्या अवसानानंतर मात्र तिचे डोळे उघडले. त्याच्या थडग्यावर ती ऊर बडवूं लागली. क्रूसच्या रूपानं त्याच्या प्रीतीचं चिन्ह अद्यापहि ती बाळगीत आहेच ना !

इटलीच्या लोकांनीं मुसोलिनीला नेता म्हणून निवडलं ! त्याची पूजा केली. त्याच्या गुणांचे पवाडे गायिले. आणि अखेर कुत्र्यासारखा त्याचा खून करून पदप्रहारांनींच त्याचा सत्कार केला !

उत्कट प्रेमानं मिठी मारण्यासाठीं प्रियकराच्या गळ्यांत हात घालायचे न् लगेच गळा दाबून

त्याचा प्राण घ्यायचा! स्तनांनीं चरण चुरण्याचा दखावा करायचा न् क्षणांत त्याच्यासाठीं विषार काढायचं!

आणखी कोणत्या वैचारिक आदर्शाचा पाठ-लाग करूनहि लोकदेवता त्याचा घात कर-णार आहे?......

या मृत्युनं लढाई संपत आल्याची घंटा मात्र बडविली! आणि खरंच एकदाची लढाई संपली!

लढाई सपली तरी अद्याप आम्ही रांगेत उभे आहों!

शिकविलेलं सहसा वाया जात नाहीं म्हण-तात! रांगेत उभं रहायचं शिक्षण फार पूर्वींच आम्हाला दिलं गेलं आहे! आधुनिक शिक्ष-णाच्या सखोलतेचा न् दूरगामीत्वाचा केवढा हा झणझणीत प्रत्यय! पण रांगेतल्या रेटारेटींत टिकून राहणारी ताठरता मात्र आमच्यांत उरली नाहीं. एकाद्या आघाडीवर पाठविण्यासाठीं तयार केलेली ही रांग नाहीं किंवा एकादा भयंकर गुन्हा केल्यामुळं क्रमाक्रमानं एकेकाला गोळी

घालणं सुलभ जावं म्हणूनही ही रांग करण्याचा उद्देश नाहीं !

गुन्हा म्हटला तर आहे ! जिवंत रहाण्याचा एकच भयंकर गुन्हा आम्हीं केला आहे !

रांगेतल्या एकेकाच्या चेहऱ्यावरले भावहि पहाण्यासारखें आहेत ! जणू आकाशाचा पडदा फाटणार आहे ! इंद्रपुरीचीं दारं सताड उघडलीं जाणार आहेत ! आणि रांगेतल्या माणसांना तेथली लूट मिळणार आहे !

फक्त दार उघडायचं मात्र स्वाधीन नाहीं !

इथं उभं राहून पाहिलं तर खुल्या अथवा मेघ व्याप्त आकाशाचा आलोक स्पष्ट दिसेल. त्याला पाहून एकेक उत्प्रेक्षा मनांत चमकून जाऊं शकतील. हे आकाश !

वर्षाकालच्या पानोत्सवाच्या निमित्तानं रूपरसानं भारावलेल्या न् उन्मादानं बेताल झालेल्या मेघकामिनींचा मेळा जमला आहे. नृत्य चाललं आहे. त्या भावपूर्ण हालचालींत वस्त्राची शुद्ध नाहीं. एकाच उत्तान अनावर भावनेनं चळचळ-

णाऱ्या त्याच्या उरांतली अभिलाषा विजेच्या मिषानं कडकडून आली कीं भल्याभल्यांचा तोल राहील असं वाटत नाहीं !

अशा गढूळ वातावरणांतहि तूं मात्र विन्मुख आहेस, उन्नत आहेस. आणि संयत आहेस ! आपल्या प्रीतीचा एकमेव निळा आभास जागवीत बसला आहेस ! धन्य तुझं प्रेम कीं ज्याच्या चिंतनांतून चंद्रिका पसरते नाहीं तर तेजोनिधी साक्षात् होतो. काळी भोर रात्र पसरली कीं वाटू लागतं आम्हा मानवांची दूषित दृष्टी टाळण्यासाठीं, तुझी प्रेयसी आपल्या मऊशीत कचभाराखालीं तुझं तोंड झाकून मनसोक्त चुंबित आहे !

पण पुन्हां बघावं तर तूं उदास आणि निळा !

तूं एकाद्या पार्वतीची नाहीं तर एकाद्या जानकीची फसगत तर केली नाहींस ?

मग हा चिरविरहाचा तुला शाप कां म्हणून ?

आभाळ नसलं तर त्या निळ्या आशयाखालीं शांति ब्रम्हाचा निवास ( **Zone of Silence** )

कुठ असावा याचा शोध घेत घेत निरवधान होतां येईल !

दूरची क्षितिजं नजरेच्या कक्षेंत येतील असा उंचवटा इथं नसला तरी रसेचं घर, त्या घराची रचना आणि घरांतल्या हालचालींचा येथून वेधहि घेतां येतो !

तिची ती विलक्षण मोहक गौरमोहिनी ! वस्त्र प्रावरणांनीं सजविली तरी आकर्षक ! वसनाचे अंतराय झुगारून अन् दीप विझवून पाहिली तर पतंग झेप घेतील अन् ही शीतल दीप्ति म्हणून निराश होऊन परततील, अशी मनोरम !

एकाद्या कादंबरीतलं नखरेल लाजाळू असं आमचं प्रेम नाहीं ! तें जितकं धीट तितकंच संयत ! ते उत्तान तितकंच गाढ ! वयानं ती विकसित आणि परिपूर्ण ! कांहीं शिकवायची सांगायची आवश्यकता नाहीं, जवळ ये म्हणून संकेत करायचं कारण नाहीं. एकाद्या नवोढेच्या अभेद्य लज्जेशी करावा लागतो तसा झगडा करण्याचं कारण नाहीं. ओठ जुळविले कीं तें चुंबनासाठींच अस जाणून प्रत्युत्तर करायची तयारी !

बाहू पसरले कीं तें आलिंगनाच्या ओढीनंच हें ओळखून त्यांत शिरायची तत्परता.

हें सारं ठीक होतं. पण आकाशावर एकेक उत्प्रेक्षा रचायच्या, शांति ब्रम्हाचा शोध घेत बसायचं, 'रसा दार उघड!' असं आर्त होऊन म्हणायचं कीं रांगेतली आपली जागा सांभाळायची असा प्रश्न होता. कला, काव्य, प्रेम यांचा आस्वाद घेणाऱ्या, उपासनाची जोपासना करणाऱ्या वृत्ति नुसत्या कुसकरून गेल्या आहेत.

ही रांग अशा ठिकाणीं आहे की जिथं आजच्या संस्कृतीच्या विकासाच्या न् संवर्धनाच्या साऱ्या नाड्या गुंतून पडल्या आहेत!

मोठा आहे हा!

अन् धान्याच्या दुकानापुढं वाटपाची वाट पहाणारी रांग आहे ही!

रांगेंत विविध वृत्तींचं प्रदर्शन ही दिसतं!

एक दिवाळखोर देशमुखी थाट रस्त्यावरच्या एका महारणीकडं पहातो आहे! चांगले पहाण्या-

सारखे चेहरेहि आतांशा दृष्टीस पडत नाहींत. तरी ती देशमुखी शेजाऱ्याला कोपऱ्याखळीनं धक्का देत म्हणते आहे,

"चालतां बोलतांना लागला धक्का त्याचा राग"

शुष्क वृत्तींना धार आणण्याचा हा एक निर्जिव प्रयत्न आहे!

आमच्या वर्गातले एक बळवंतराव जवळच्या नानासाहेबाला म्हणताहेत,

"आंऽ नानासाहेब! केव्हां आलात? कांहीं नवीन बातमी! महागाई भत्ता वाढणार असल्याचं गॅझेटांत आलं होतं तें खरं कां? नाहीं वरच्या ऑफिसांत जाऊन आलात म्हणून विचारलं!

एवढ्या उलथापालथी झाल्या आणि होऊं घातल्या तरी महागाई भत्त्याचाच विचार करणारी वृत्ती कोणत्या दर्जाची? दर्जा कोणता कां असेना पण ती सरळ आहे. अन् अडचणीवाचून जगतां यावं हीच इच्छा आहे!

एक वृद्धापकाळ जांभाई देऊन म्हणतो आहे,

"अरे राम दुकान उघडतय कीं नाहीं आज? यापेक्षा तकदीराचा दरवाजा खटखटला असता तर कांहीं चांगली बात घडून तरी आली असती!"

एक उत्तर आलं,

"बेशक! पण नशिबाचा दरवाजा दगडाचा असतो. कपाळमोक्षाशिवाय तो उघडत नाहीं!"

हास्यानंच या भाष्याचं स्वागत झालं!

आणखी एक आवाज म्हाताऱ्याला म्हणाला,

"ज्याच्या गोवऱ्या स्मशानांत गेल्या आहेत, त्यांनीं धान्याच्या दुकानापुढली जागा अडविण्यांत अर्थ नाहीं!"

म्हातारा म्हणूं लागला,

"अरे भाई! तूं अजून बच्चा आहेस! एक गोष्ट सांगतो ऐक. असाच तुझ्या वयाचा एक राजा होता. राजवाड्याच्या गच्चीवर बसल्यावर त्याला बागेंत अजब दृष्य दिसलं. बागेचा

म्हातारा माळी वेलीच्या ताटव्याखालीं आपल्या जख्खड बायकोशीं इष्क करीत आहे! पातशहा संतापला. त्यानं म्हाताऱ्याला धरून आणलं न फांसावर चढवायचा हुकूम दिला! म्हातारी मोठी समजदार होती. मुठींत कांहीं तरी झाकून ती राजापुढं आली. मूठ उघडून ती राजाला म्हणाली, जोंवर जगांत हं आहे तोंवर वासना कांहीं मर-णार नाहीं! मुठींत काय होत? तांदूळ!"

अशा विविध वयोमान आणि प्रवृत्तीबरोबर भारतांतल्या सर्वत्र जाती उपजातीतलीं माणसं या रांगेत आहेत! अन्नाच्या निमित्तानं सर्वत्र एका रांगेत, एका दर्जात आलेल्या या जाती म्हणजे केवढं संतोषदायी दृश्य!

पण कालमान न ओळखणारी न् कालमानाचा फायदा घेणारीं माणसं ह्यांत आहेत! ती पहा पांचव्या कां सहाव्या नंबराला ढकलून कुणी एक आसामी जबरीनं घुसली.

रांगेची व्यवस्था करणाऱ्या सत्तेच्या प्रति-निधीच्या नजरेस ही गोष्ट आणली गेली.

सरकारी दूताकडून उत्तर आलं आहे,

"मागं उभं राहिलं तर बिघडलं काय? पुढं उभं राहून धान्य अधिक मिळतं असं थोडंच आहे"

या तत्वज्ञानानं अवमानित माणसाचं समाधान होणं शक्य नाहीं. तो चरफडत मुकाट्यानं मागं सरकला होता!

जबरीनं आंत घुसलेला माणूस, न् त्याला सहाय्य करणारा सरकारी प्रतिनिधी, कोण होते?

मुसलमान !

बंधुभावाची शिकवण देणारे मोठ्या तळमळीनं लिहिलेले लेख अथवा व्याख्यान अशा वेळीं मनाला सावरून धरू शकत नाहींत!

जीवनाच्या प्रत्येक क्षणांत एका विशिष्ट जातीलाच महत्व दिलं जावं, तें तसं देण्याचंच एकाद्या सत्तेची सारी शक्ति केंद्रित झालेली दिसावी?

मनुष्यांत मनुष्याला दाखवावयाच्या औदार्याचा हा धडधडींत खून तो! यांतच आजचं राज-

कारण आंदोलत होत ! बहुसंख्यांनीं सहानुभाव व्यापक ठेवावा या म्हणण्याला विरोध नव्हता. पण सहसा दुर्लभ आणि अमोल सहानुभाव स्वीकारण्याची न् जिंकण्याची पात्रता अल्पसंख्याकांनीं मिळवण तर अवश्यक होतं ना !

शेत मोठ्या मेहनतीनं नागरलं जातं ! पीक चांगलं यावं हा हेतू ! पेरणी होते न् ज्वारीची हिरवी गार धाटं पाहून शेतकऱ्याला वाटूं लागतं, आपल्या श्रमाचं आतां चीज होणार ! त्या सबंध ज्वारीत एकादंच कणीस असं निघतं कीं, शेतकरी ज्यासाठीं कष्ट करतो ती मोत्यांची देणगी त्याला नसते ! भूमि एक ! निर्मितीसाठी खपणारे हातहि एकाचेच ! निर्मितीच्या मुळाशीं एकच भावना ! आकार विकार सारे कणसाचेच ! पण अंतरंग असं कीं शेतकऱ्याच्या श्रमाचं त्यांत चीज नाहीं ! त्याच्या जीवनाचं सत्व नाही !

अशा कणसाला शेतकरी मुसलमान म्हणतात !

या रांगेत अशी ही माणसं आहेत कीं ज्यांच्या घरांत धान्याचा, तेलाचा, अन् इतर जीवनोपयोगी वस्तूंचा भरपूर सांठा असेल ! तो शक्य तो

वाढवावा म्हणून ते इथं धक्के सहन करीत उभे आहेत ! उद्या धान्य दुर्मिळ झालं तर काय करा या भयांतून ही चिकाटी निघाली ! भविष्य अनिश्चित झाल्याचा हा पुरावा आहे ! उद्यावरचा माणसाचा विश्वास उडाला तर जीवनांतील महत्तम आणि पवित्र गोष्टींची जपणूक होऊं नये यांत आश्चर्य नव्हतं !

लढाईनं हा क्रम सुरू केला ! अन् लढाई संपल्यावर तरी असं कोणतं प्रसन्न दृश्य दिसतं आहे ! अनीतीचे, अशांतीचे नुसते खच पडले आहेत ! कांहीं घडण्याऐवजीं जिकडं तिकडं नुसता बिघाड दिसतो आहे ! एकाचा अहंकार भडकला न् वाटलं प्रलयानं आपले पाय रुतविले आतां ! त्याच्या प्रतिकारासाठीं कित्येक शक्ति उठल्या ! हातांत शस्त्र नसलेला, गुलामीच्या कवचांत गदमदून जात असलेला, मोठमोठ्या वैचारिक आदर्शांची उपासना करणारा मनुष्य जातीचं हित व्हावं अशी सदिच्छा वागविणारा माणूस त्या तशा हादरलेल्या न डळमळत्या भूमीवर भविष्याकडं दृष्टी लावून बसला तो अहंकारी जगाचा नायनाट होऊन नवं मनः-

कल्पित आणि मनःपूजित जग अवतरणार अशा विश्वासानं !

पण युद्धोत्तर जग म्हणजे जुन्याच जगाची नवी आवृत्ति दिसते आहे!

परवाच आमची चाळ बापू कन्नुवारच्या मालकीची झाली. त्याचा नोकर चाळीतल्या भाडेकरूंला सांगू लागला.

" ही सबंध चाळ आतां बापूशेठ कन्नुवारच्या मालकीची झाली आहे मालकानं दीडपट भाडं वाढवायला सांगितलं आहे. ज्यांना परवडत असेल त्यांनीं रहावं, नसतां आठ दिवसांत जागा रिकामी करावी ! "

जुन्याकाळीं एक राजा पराजित होऊन दुसरा गादीवर आला कीं चहुकड द्वाही फिरविण्यांत येत असे, 'नवे राजेसाहेब गादीवर आले आहेत, प्रत्येकान अमुक इतका कर भरावा, असा हुकुम आहे. ज्यांना मान्य असेल त्यांनीं तो तत्काळ दाखल करावा. नाहीं म्हणणाराचं घरदार जप्त होईल न् त्यांना राज्याबाहेर काढून देण्यांत येईल !'

त्या राजाज्ञेंत आणि या हुकुमांत विशेष कांहींच फरक नव्हता!

एक चाळ दुसऱ्याच्या मालकीची झाली होती. एका ठिकाणचा पैसा दुसऱ्या ठिकाणीं आला होता.

महायुद्धानं जो कांहीं बदल झाला असेल तो एवढाच!

मानवतेच्या संरक्षणाची ज्यांनीं शपथ घेतली तेच संहाराचे विश्वव्यापी कट रचाताहेत! विनाशाच्या पद्धतशीर योजना आवरताहेत ! रक्ताचं संरक्षण रक्त पिऊन करायचं ! रक्ताशिवाय कित्येकांच्या शस्त्रास्त्रांना धार येईनाशी झाली आहे ! बंधुभावाच्या उमाळ्याचं प्रदर्शनहि रक्तावाचून होईनासं झालं आहे ! एवढीं माणसं मारली, गांव बेचिराख केलीं, तरी जुने डाग निघण्याऐवजीं नवे कलंक चिरस्थाई झाल्याचं दिसतं आहे ! ध्येयांचीं पटकुरं करायचीं, आदर्शांचे पायपोस करायचे एवढच आजच्या बलानं साधलं आहे न् त्याला नैतिकता आणण्यासाठीं सांघिक कार्यक्रम चालू आहेत !

अशा जगांत उदात्त अविनाशी भावना वाङ्मयांतून जो पासच्या कीं त्यावर पुटं चढलेलीं बघायचीं ? वीरवृत्तीचीं स्तोत्रं गायची कीं पशु-

तेचं प्रदर्शन पहायचं ? माणसाला माणूस म्हणून जगूं द्या असं उच्च स्वरानं सांगायचं कीं माणूस-कीचे खून पडलेले पहायचे ?

नवं जग रंगविण्यासाठीं जे रंग निवडले, जी घडण कल्पिली, जे भाव भावस्थीर केले त्यांचा विचका झाल्याचं माणूस पाहूं शकतो ? सहन करूं शकतो ?

नाहीं कसं म्हणाव ?

ते तसं पहात आणि सहन करीत मीं, आम्हीं, तुम्हीं या रांगेत उभे आहोंच ना !

अर्धा पाऊण तास तिष्ठत ठेवल्यावर कुणी एका महाभागानं येऊन सांगितल,

" दुकान उघडत नाहीं ! अपेक्षित साठा अद्याप आला नाहीं ! तो केव्हां येईल याचा नेम सांगवत नाहीं ! "......

युद्ध सुरूं झाल्यापासून हाच अनुभव आला न् युद्धानंतरहि तो तसाच येतो आहे. पण या आपत्तिबद्दल आतां वाईट वाटून घेण्यांत कांहींच अर्थ नव्हता. पिचलेल्या न् खचलेल्यासाठीं अनुकूल परिस्थिती टप्याटप्यानं पुढं येते आहे, असहि आपत्ति सांगते आहे ! लढाईनं आणखी एक गोष्ट सिद्ध केली आहे, चिरडलेले उत्थापित होऊं शकतात न् जगाला हालवूं शकतात !

## प्रकाशित

| | | |
|---|---|---|
| १ | माझें कादंबरी लेखन ... | १॥ |
| २ | वीणा .. ... ... | ३ |
| ३ | लढवय्ये ... ... ... | ३ |
| ४ | शककर्ता शालिवाहन . .. | २॥ |
| ५ | परामर्श .. ... ... | ३ |
| ६ | प्रमद्वरा .. . . | २। |
| ७ | अमावास्या .. ... ... | २॥ |
| ८ | द्राविडी प्राणायाम ... | २। |
| ९ | प्रत्यय ... ... ... | २॥ |
| १० | कंगाल ... ... ... | २। |
| ११ | दोन घडीचा डाव ... ... | २॥ |
| १२ | माझी शीला... ... .. | १। |
| १३ | पुन्हां एकदां ... ... | ३। |
| १४ | अडेल तट्टू .. ... ... | ३॥ |
| १५ | मृगाचा पाऊस ... ... | २ |
| १६ | लांब लांब सावल्या ... ... | २ |
| १७ | सन् १८५७ चें युद्ध ... ... | ॥ |
| १८ | तेरी चूप मेरी चूप ... ... | २ |
| १९ | दोन प्रख्यात युद्धतंत्रें ... ... | २ |
| २० | म्हणे लढाई संपली ... ... | १॥ |

**नागपूर प्रकाशन, सिताबर्डी, नागपूर.**

## आगामी

( १ ) सखी–कादंबरी

वि. वि. बोकील

( २ ) नवी मुल्यें–लेखसंग्रह

पु. य. देशपांडे

( ३ ) सावलीच्या उन्हांत–कादंबरी

प्रा०–श्रीराम अत्तरदे

( ४ ) जीवनप्रवाह–कादंबरी

द. गं. प्रधान

( ५ ) चौथें पानिपत–कादंबरी

बी. रघुनाथ

( ६ ) जपानचें अभिनव युद्धतंत्र

( ७ ) महायुद्धाचा वणवा (सहाभागांत प्रसिद्ध होणार)

हरिहर वामन देशपांडे

प्रती थोड्या छापणार आहोंत

ग्राहकांनी आपली ऑर्डर आगाऊ नोंदवावी

**नागपूर प्रकाशन, सिताबर्डी, नागपूर.**